**महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात भाग भांडवली अंशदान अनुदान वितरीत करणेबाबत (Conditional)..**
**लेखाशिर्ष ४२३५०७४३, ५४-गुंतवणूका.**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : दिविम-२०२४/प्र.क्र.६५/दिव्यांग कल्याण-३**
३१,३२,३५ ए, तिसरा मजला, ए-विंग, मित्तल टॉवर,
नरीमन पॉईंट,मुंबई - ४०० ०२१.
दिनांक :- ३१ मार्च, २०२५

**वाचा:**
१. वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि.१२.०१.२०२३.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५.
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१७.०३.२०२५.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे दिनांक २४.१०.२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांच्यामार्फत राज्यातील दिव्यांग व्यक्तींना स्वयंरोजगारासाठी कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य उपलब्ध करुन त्यांना स्वावलंबी बनविण्याचे कार्य करण्यात येते. तसेच राष्ट्रीय विकलांग वित्त एवम् विकास निगम, नवी दिल्ली या राष्ट्रीय महामंडळाची राज्य प्राधिकृत वाहिनी म्हणून हे महामंडळ काम करते.

२. महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. झेडआय-४, ४२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२३५०७४३), ५४ गुंतवणुका या उद्दीष्टाकरीता रुपये १५ कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली होती. तथापि, सुधारित अंदाजानुसार रुपये १०.५० कोटी इतकी तरतूद करण्यात आली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकानुसार ५४-गुंतवणूका या उद्दीष्टाकरीता निधी वितरणाची मर्यादा ७० टक्के निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार वित्त विभागाकडून भाग भांडवली अंशदान (४२३५०७४३), ५४ गुंतवणुका या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पिय मर्यादेत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणाली (BEAMS) वर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. बिम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. झेडआय-४, ४२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२३५०७४३) ५४-गुंतवणूका या उद्दीष्टाकरीता सुधारित अंदाजाच्या मर्यादेत रुपये ३,१४,००,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी चौदा लक्ष फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे:-

**(रुपये हजारात)**

| **अ.क्र.** | **अनिवार्य योजनेचे नाव** | **लेखाशीर्ष व उद्दीष्ट** | **सन २०२४-२५ करीता सुधारीत अर्थसंकल्पीय तरतूद** | **सन २०२४-२५ करीता विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | मागणी क्र.झेडआय-४, ४२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च, भाग भांडवली अंशदान | ४२३५०७४३ भाग भांडवली अंशदान ५४-गुंतवणूका | १०,५०,०० | ३,१४,०० |

२. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या परिपत्रकामध्ये नमूद परिच्छेद ४ ते १८ मधील मार्गदर्शक सूचना व परिशिष्टातील मार्गदर्शक सूचना तसेच वित्त विभागाच्या दिनांक १७.०३.२०२५ च्या परिपत्रकातील परिच्छेद ५ मधील मार्गदर्शक सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

३. या बाबींवरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा:-

**मागणी क्र.झेडआय-४,**
**४२३२, सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च,**
**०२, समाज कल्याण,**
**१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका,**
**(०१) भागभांडवली अंशदान,**
**(०१) (०१) महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४२३५०७४३)**
**५४, गुंतवणुका**

४. या अनुदानाबाबत उप सचिव (दिव्यांग कल्याण-२), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम पुढील कार्यवाहीकरीता आहरण व संवितरण अधिकारी,

दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे सुपुर्द करण्यात येत आहे. **वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि. १२.०१.२०२३ नुसार सदरचे अनुदान हे सशर्त आहे.** त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासन व महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक- **५१८/२०२५/व्यय-१४, दिनांक ३१/३/२०२५** अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११७२४००२७३५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SUNANDA MOHANRAO GHADYALE

Digitally signed by SUNANDA MOHANRAO GHADYALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5ADFF2513F33AFA9ED70C79C5A4636204D8BB4040BF2C6C2470D0F20D8DC79D, cn=SUNANDA MOHANRAO GHADYALE
Date: 2025.03.31 17:24:57 +05'30'

**(सुनंदा मो.घड्याळे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (दिव्यांग कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक.
२) अपर मुख्य सचिव (दिव्यांग कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक.
३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) उप सचिव, (दिव्यांग कल्याण-२), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
५) उप सचिव/अवर सचिव (दिव्यांग कल्याण-३), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
६) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या.,मुंबई
७) आहरण व संवितरण अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कक्ष अधिकारी, (दिव्यांग कल्याण-२), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
९) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प/साउ), मंत्रालय, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
११) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) निवड नस्ती (दिव्यांग कल्याण-३)

......